**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एएससी-१५२३/प्र.क्र.१०७/प्रशा-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

तारीख: ०७ मार्च, २०२४

**संदर्भ -** १) सा.प्र.वि.पत्र क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.४८/०४/१४-अ, दिनांक ७.६.२००४.

२) सा.प्र.वि.पत्र क्र.संकीर्ण-१००७/प्र.क्र.११८/०७/१४-अ, दिनांक १३.९.२००७.

३)सा.प्र.वि.आदेश क्र.सीसीए-१७११/प्र.क्र.९३/२०११/१४-अ, दि.८.१२.२०११.

४) सा.प्र.वि. आदेश क्र. एएससी-१५२३/प्र.क्र. १०७/१४-अ, दि. १०.११.२०२३

५) सा.प्र.वि. आदेश क्र. एएससी-१५२३/प्र.क्र. १०७/१४-अ, दि. ०७.१२.२०२३

**-आदेश-**

सन २०२३-२०२४ या तदर्थ निवडसूचीतून मंत्रालयीन विभागातील खालील लिपिक-टंकलेखकांना [गट (क) अराजपत्रित- वेतनश्रेणी एस-६ रु.१९९००-६३२००] सहायक कक्ष अधिकारी या पदावर [गट(ब) अराजपत्रित- वेतनश्रेणी एस-१४ रु.३८६००-१२२८००] या आदेशाद्वारे विहित अटीच्या अधीनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर लिपिक-टंकलेखकांची सहायक कक्ष अधिकारी या पदावरील निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे.

| अ. क्र. | श्री / श्रीमती | नांव | कर्मचाऱ्याचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री | प्र.ल. तायशेटे | खुला | सामान्य प्रशासन विभाग | महसूल व वन विभाग |
| २ | श्री | फु.सो. मुंडे | खुला | वित्त विभाग | वित्त विभाग |
| ३ | श्रीमती | ह.प्रे. नाईक | अज | नियोजन विभाग | नियोजन विभाग |
| ४ | श्री | कु.सु. विरकर | खुला | वित्त विभाग | वित्त विभाग |
| ५ | श्रीमती | रा. नि. आंधळे | भज (ड) | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग |
| ६ | श्री | अ.दों. भालचिम | अज | सार्वजनिक आरोग्य विभाग | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| ७ | श्रीमती | शि.सा. भिंगारदेवे | अजा | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ८ | श्री | मं.य. कुऱ्हाडे | अज | नगर विकास विभाग | नगर विकास विभाग |
| ९ | श्रीमती | स्व.सु. चिंदरकर | इमाव | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |

| अ. क्र. | श्री / श्रीमती | नांव | कर्मचाऱ्याचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १० | श्री | वै.वि. चव्हाण | खुला | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ११ | श्री | ओं.वि. मळये | खुला | गृह विभाग | गृह विभाग |
| १२ | श्री | म.मा. शिंदे | खुला | गृह विभाग | गृह विभाग |
| १३ | श्री | सु.रा. कांबळे | अजा | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| १४ | श्री | सु.सु. आंबवकर | अजा | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| १५ | श्रीमती | र.प्र. नलावडे | खुला | सार्वजनिक बांधकाम विभाग | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| १६ | श्रीमती | सु.स. सागवेकर | इमाव | मराठी भाषा विभाग | मराठी भाषा विभाग |
| १७ | श्री | भा.शा. खामकर | खुला | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | उच्च व तंत्रशिक्षण विभाग |
| १८ | श्री | सु.म. गायकवाड | अजा | वित्त विभाग | वित्त विभाग |
| १९ | श्री | स.कि. बोडरे | विजा(अ) | नियोजन विभाग | नियोजन विभाग |
| २० | श्री | सं.मा. लाड | भज (क) | मृद व जलसंधारण विभाग | मृद व जलसंधारण विभाग |
| २१ | श्री | ना.रा. दोडके (दिव्यांग प्रवर्ग गट-क अस्थिव्यंग) | अजा (शा. अ) | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६-ब च्या शासन निर्णय दि.७.५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

३. सदर लिपिक-टंकलेखक यांना सहायक कक्ष अधिकारी या पदावरील निव्वळ तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे-

(अ) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

(ब) लिपिक-टंकलेखकांना सहायक कक्ष अधिकारी पदावरील निव्वळ तात्पुरती पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे. संबंधित विभागांनी याची खातरजमा करावी.

(क) सदर तदर्थ पदोन्नती अकरा महिन्यांच्या कालावधीसाठी असेल तथापि, त्यानंतर सदरहू तदर्थ पदोन्नतीस मुदतवाढ देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र.संकीर्ण-१००७/प्र.क्र.११८/०७/१४-अ, दिनांक १३.९.२००७ व शासन निर्णय दिनांक ०१-०८-२०१९ मधील तरतुदीनुसार संबंधित विभागामार्फत करण्यात यावी.

(ड) या निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित लिपिक-टंकलेखक यांना नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा आणखी कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(इ) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधितांचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

(ई) सदर पदोन्नत्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात असून या पदोन्नत्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

(उ) सदर पदोन्नत्या मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. संबंधित लिपिक-टंकलेखक यांनी सहायक कक्ष अधिकारी पदाची तदर्थ पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय,क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०२३-२०२४ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.

५. या शासन आदेशातील अनुक्रमांक २१ येथील लिपिक-टंकलेखकांना सहायक कक्ष अधिकारी या पदावरील तात्पुरती पदोन्नती दिव्यांग प्रवर्गातून करण्यात येत आहे.

६. महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरणातील तरतुदीनुसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे संबंधितांवर बंधनकारक राहील.

७. सहायक कक्ष अधिकारी पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यापुर्वी संबंधित मंत्रालयीन विभागाने लिपिक-टंकलेखकांचे जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्राबाबतची खातरजमा करण्यात यावी.

८. पदोन्नत लिपिक- टंकलेखकांनी या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांमध्ये सहायक कक्ष अधिकारी पदावर रूजू होणे आवश्यक आहे. संबंधित विभागाने पदोन्नत झालेल्या सहायक कक्ष अधिकारी यांना विहित कालावधीत कार्यमुक्त करावे.

९. संबंधित विभागांनी कार्यमुक्ततेच्या तसेच रुजू करून घेतल्याच्या आदेशाच्या प्रती कार्यासन प्रशा-३ ला पाठवाव्यात.

१०. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत लिपिक-टंकलेखकांच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

११. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०७१५५३१०७३०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.03.07 16:03:24 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित लिपिक-टंकलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
२. सह सचिव / उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग
३. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.प्रशा-१ ,प्रशा-२, प्रशा-३.
४. निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन प्रशा-३)

(संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत)